# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन ज्ञापन क्र. दुरुस्ती-०११९/प्र.क्र.२१५/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २२ नोव्हेंबर २०१९.

**विषय** :- महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, येथील *"I.P. Mess"* मधील *"V.V.I.P. Guest Suits"* यांचे *"Restoration"* व *"Upgradation"* करणे यांसाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.

४) शासन परिपत्रक, सा.बां. विभाग, क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा.-२, दिनांक २५.०९.२०१९.

५) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ १९-ए/ पोलीस-प्रशिक्षण-केंद्रे/ दुरुस्तीचे-प्रस्ताव/ ५९/२०१९, दिनांक २०.११.२०१९.

**ज्ञापन.-**

पोलीस महासंचालक, म.रा., यांनी महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, येथील *"I.P. Mess"* मधील *"V.V.I.P. Guest Suits"* यांचे *"Restoration"* व *"Upgradation"* करणे यांसाठी रु.१,९९,९९,७४४/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे उप विभागीय अभियंता, दक्षिण (सा.बां.) उप विभाग, नाशिक, यांनी सन २०१९-२० च्या राज्य दरसूचीनुसार तयार केले असून ते (१) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, नाशिक, (२) अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, व (३) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, यांनी साक्षांकित केले आहेत. तसेच, उक्त खर्चाच्या अंदाजास मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, नाशिक, यांनी तांत्रिक मंजुरी दिली आहे.

३. त्या अनुसार, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, येथील *"I.P. Mess"* मधील *"V.V.I.P. Guest Suits"* यांचे *"Restoration"* व *"Upgradation"* करणे यांसाठी रु.१,९९,९९,७४४/- *(रुपये एक कोटी, नव्याण्णव लक्ष, नव्याण्णव हजार, सातशे चव्वेचाळीस फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये या अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**४.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस ००, १०९, जिल्हा पोलीस (००) (००)(०१), जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८), (दत्तमत) (अनिवार्य), २७-लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** हे शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.३ येथील वित्तीय शक्तींच्या बाबतीत प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२२१५०४११००२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627,
postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI,
serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e,
ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.11.22 15:10:56 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.

**प्रत-**

१) मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, नाशिक.
२) अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, नाशिक.
३) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, नाशिक.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).